(२०७) 201504221706521527

तरंदळे लघु पाटबंधारे योजना ता.कणकवली जि.सिंधुदुर्ग सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबत.

महाराष्ट्र शासन
जलसंपदा विभाग
शासन निर्णय क्र. लपायो २००६/(४२१/०६)/खारभूमी
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : २६/०७/२००७

**पहावे** : १) कार्यकारी संचालक, कोकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे यांचे पत्र क्र. कोपाविमं/तां-१/तरंदळे/सुप्रमा/२७४२/०६, दि.८.९.०६

**प्रस्तावना :**

तरंदळे लघु पाटबंधारे योजना ता.कणकवली जि.सिंधुदूर्ग या योजनेस शासन निर्णय लपायो १२९६/(२९२/९६) खारभूमी दि.९.१२.१९९६ अन्वये रु.९७५.१५ लक्ष इतक्या रकमेस प्रशासकीय मान्यता देण्यात आली होती. परंतु सदर योजनेस निधी प्राप्त न झाल्याने मान्यता व्यपगत झाली. त्यानंतर कार्यकारी संचालक, कोकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे यांचे कार्यालयीन आदेश क्र.कोपाविम/तां-३/१८११, दि.२३.६.०४ अन्वये रु.१४७५.६९ लक्ष किमतीस नव्याने प्रशासकीय मान्यता देण्यात आली होती. प्रकल्पाच्या संपूटी (सॅडल) धरणाचे काम जवळपास पूर्ण झाले असून मुख्य धरणाच्या कामास सुरवात करण्यात आली आहे. दरसूचीतील दरामधील फरक, जादा दराची निविदा, संकल्पचित्रातील बदल, व्याप्तीतील बदल इत्यादी कारणामुळे योजनेच्या किमतीत वाढ अपेक्षीत असल्याने सन सन २००५-०६ च्या दरसूचीवर आधारित रु.२७७६.६८ लक्ष किंमतीच्या प्रकल्पास सुधारित प्रशासकीय मान्यता मिळण्याचा प्रस्ताव कार्यकारी संचालक, कोकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे यांच्याकडून शासनास प्राप्त झाला व तो शासनाच्या विचाराधीन होता. सदर प्रस्तावा संदर्भात शासनाने पुढील प्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय**

आता या शासन निर्णयान्वये तरंदळे लघु पाटबंधारे योजना ता.कणकवली जि.सिंधुदूर्ग या योजनेस सन २००५-०६ वर्षाच्या दरसूचीवर आधारित सुधारित केलेल्या प्राक्कलनानुसार कामाच्या एकूण अंदाजित खर्च रु.२७,७६,६७,९०७/- (रुपये सत्तावीस कोटी, शहात्तर लक्ष, सदुसष्ट हजार, नऊशे सात फक्त) यापैकी रु.२३,४४,०७,७६८/- कामाप्रित्यर्थ व रुपये ४,३२,६०,१३९/- आनुषंगिक खर्च या रकमेस सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे. उप शिर्षवार तरतूदीचा गोषवारा सोबत परिशिष्टामध्ये देण्यात येत आहे.

या योजनेच्या कामावरील खर्च मागणी क्र. आय-५, मुख्य लेखाशिर्ष "४७०२ लहान पाटबंधाऱ्यावरील भांडवली खर्च पंचवार्षिक योजनांतर्गत योजना (१९०) सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणूक (०२) कोकण पाटबंधारे विकास महामंडळ भाग भांडवली अंशदान

योजनांतर्गत (संगणक साकेतांक क्र.४७०२/४९०/९)" या लेखाशिर्षाखाली खर्ची घालावा व चालू आर्थिक वर्षात कोकण पाटबंधारे विकास महामंडळाकडे उपलब्ध होणाऱ्या तरतूदींतून परस्पर भागविण्यात यावा.

हा शासन निर्णय शा.नि.क्र.संकिर्ण १०९९/(१२६/९९) मोप्र (प्र) दि.१८.५.९९ मधील अनुसार आंतरवित्त सल्लागार व उप सचिव यांच्या सहमतीने प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकाराचा वापर करून निर्गमित करण्यात येत आहे.

या योजनेस प्रदान करण्यात आलेली सुधारित प्रशासकिय मान्यता (०६/२००७) अनुक्रमांकावर नोंदण्यात आली आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

(रा. च. हुमणे)
शासनाचे अवर सचिव

प्रतिलिपी.

महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर.
महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखा परिक्षा), मुंबई/नागपूर.
वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई ३२
नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई ३२
कार्यकारी संचालक, कोकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे
आंतर वित्त सल्लागार व उप सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
उप सचिव (लपा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
अधीक्षक अभियंता, दक्षिण कोकण पाटबंधारे प्रकल्प मंडळ, ओरस
कार्यकारी अभियंता, मध्यम प्रकल्प विभाग, आंबडे, ओरस, जि सिंधुदूर्ग
उप अभियंता, (खारभूमी), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
अर्थशाखा १/२ (२ प्रती), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
लपा-१ (२ प्रती), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
जिल्हाधिकारी, सिंधुदूर्ग
विभागीय संपर्क अधिकारी, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई. (२ प्रती)
संगणक कक्ष, मंत्रालय, मुंबई-३२.
खारभूमी संग्रहार्थ.

शासन निर्णय क्रमांक लपायो २००६/(४२१/०६)/खारभूमी दि. २६/०७/२००७ चे परिशिष्ट

**तरंदळे लघु पाटबंधारे योजना ता.कणकवली जि.सिधुदुर्ग**

**अंदाजपत्रकाचा गोषवारा**

| क्र. | शिर्ष/उपशिर्ष | रक्कम (रुपये लक्ष) | | एकूण रुपयात |
|---|---|---|---|---|
| | | शिर्षकामे | मुख्य व शाखा कालवे | |
| १. | 'ए' प्राथमिक | १५००००० | ४१०२९६ | १९१०२९६ |
| २. | 'बी' (भूसंपादने) | ३६०९८६९१ | १२१५२७९ | ३७३१३९७० |
| ३. | 'सी' मुख्य कामे | १७६९३६०४० | ----- | १७६९३६०४० |
| ४. | डी विमोचक | ९९७६६५४५ | ७७२६३२ | १०७४९१७७ |
| ५. | ई फॉल | | | |
| ६. | एफ आरएचटी वर्क्स | --- | १४९८४८० | १४९८४८० |
| ७. | जी पूल(सीटी क्रॉसिंग | --- | ९२६६५१ | ९२६६५१ |
| ८. | एच एस्केप | --- | ५००००० | ५००००० |
| ९. | 'के' इमारती | १२२५०० | ------ | १२२५०० |
| १०. | एल मातीकाम | | २५८३७१२ | २५८३७१२ |
| ११. | एम वृक्षारोपन | २०२५० | १६००० | ३६२५० |
| १२. | 'ओ' संकिर्ण | २१५००० | २५१८८९ | ४६६८८९ |
| १३. | 'पी' देखभाल | ४६७२८१ | ६४५९ | ४७३७४० |
| १४. | 'आर' दळणवळण | ५००००० | ----- | ५००००० |
| १५ | वितरिका | ----- | ११९००६३ | ११९००६३ |
| १६ | स्वामित्व शुल्क | ------ | ----- | ----- |
| | कामाप्रित्यर्थ किंमत | २२५८३६३०७ | ८५७१४६१ | २३४४०७७६८ |
| | आनुषंगिक खर्च (२५.२५% भूसंपादन वगळून) | | | ४३२६०१३९ |
| | **योजनेची एकूण किंमत** | २२५८३६३०७ | ८५७१४६१ | २७७६६७९०७ |

**उळक वैशिष्टे**

| | |
|---|---|
| योजनेची सिंचन क्षमता | ५५० हेक्टर |
| नियोजित पाणीसाठा | १०.०८४ स.घ.मी |
| पाणीसाठ्याची प्र.स.घ.मी.किंमत (रु.) (शा.नि.दि.५.१.०६ नुसार वनक्षेत्र भालमत्तामुल्य वगळून) | २७५३६ < २८०८० (आर्थिक मापदंडात बसते) |
| लाभव्यय गुणोत्तर | १.६० > १.०० (आर्थिक मापदंडात बसते) |